इंग्रजी  : बार्बरा वॉकर आणि अहमद युसाल
रेखाटनं : हॅरॉल्ड रोसॉन
मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी





# जुन्या ठिगळांना नवीन ठिगळं..!

## एक तुर्कस्तानी लोककथा



तुर्कस्तानातल्या एका शहरात हसन नावाचा चांभार रहात होता. एक दिवस हसननं आपलं दुकान वेळेआधीच बंद केलं.

“उद्यापासून सणाच्या सुट्ट्या सुरु होतायत. घरातल्या सगळ्यांसाठी काहीतरी भेटवस्तू घ्याव्यात“ असा त्यानं स्वत:च्या मनाशी विचार केला.



बायकोसाठी त्यानं एक कुरता घेतला.

आपल्या विवाहित मुलीसाठी चार रेशमी रिबिनी घेतल्या.



आपल्या आईसाठी एक मस्त ओढणी घेतली.



मग त्यानं आपल्या पोशाखाकडे एक नजर टाकली आणि स्वत:शीच उद्गारला, "मला माझ्यासाठी एक पायजमा घ्यायलाच व्हा. जुन्या पायजम्यावर खूप ठिगळं असल्यामुळे आता पायजमा दिसत नाही, ठिगळंच दिसतायत."





मग तो जलदगतीनं  एका शिंप्याकडे गेला.

“तुझ्याकडे माझ्या मापाचा पायजमा आहे का?” असं त्यानं शिंप्याला विचारलं.

“हे बघ. हा एकच पायजमा उरलाय“ असं शिंपी एक पायजमा दाखवत म्हणाला.





हसननं आपल्या पायजम्याला तो नवीन पायजमा लावून पाहिला.

“हा नवीन पायजमा कंबरेला ठीक होतोय.

पण त्याची लांबी तीन बोटं जास्त आहे. ती लांबी जरा कमी करुन द्याल का?” त्यानं शिंप्याला विचारलं.

“आज तरी मला वेळ नाही,” शिंपी म्हणाला. तू तुझ्या बायकोला सांग. ती कमी करुन देईल.

“ठीक आहे.” हसन म्हणाला. त्यानं शिंप्याला पैसे दिले आणि हातातल्या भेटवस्तू सांभाळत वेगात घराकडे निघाला.





त्याच्या बायकोला नवीन कुरता खूप आवडला.

“किती सुरेख आहे हा कुरता?” बायको म्हणाली. “पण तुम्ही तुमच्च्यासाठी काही घेतलं का नाही?”

“मी एक पायजमा घेतला आहे.” हसन म्हणाला. “पण तो पायजमा तीन बोटं लांब आहे. तू तो कापून मापाचा करशील का?”

“आत्ता नाही.” बायको म्हणाली. “आत्ता मी माझ्या कुरत्यावर चमचमणाऱ्या टिकल्या लावणार आहे. तुम्ही तुमच्या आईला का नाही सांगत? ती अशी कामं व्यवस्थित करते.”

“ठीक आहे.” हसन म्हणाला आणि तो आईच्या घरी गेला.

“आई” तो म्हणाला“ मी तुझ्यासाठी एक नवीन ओढणी आणली आहे.”

“किती सुंदर ओढणी आहे.” आई म्हणाली. “तू तुझ्यासाठी काय घेतलंस?“

“हा पायजमा घेतला आहे. पण हा थोडा लांब आहे. तो तीन बोटं कापून छोटा कर ना..“





"मुला, शिवणटिपण करायला मला आज अजिबात वेळ नाही. उद्यापासून सणाच्या सुट्‌ट्या सुरु होत आहेत." आई म्हणाली. "मला आपल्या गेलेल्या नातेवाईकांसाठी प्रार्थना पण करायची आहे. तू तुझ्या मुलीला का सांगत नाहीस? तिनंही थोडं काम करायला हवं ना.."

"ठीक आहे" हसन म्हणाला आणि तो आपल्या मुलीच्या घरी गेला.

"बेटा," तो म्हणाला .. "मी तुझ्यासाठी ही रिबिन आणली आहे."

"किती सुंदर रिबिन आहे.." मुलगी एकदम खुषीत म्हणाली. "बाबा, तुम्ही तुमच्यासाठी काय घेतलंत?"

"मी एक पायजमा विकत घेतला आहे तो म्हणाला. पण तो तीन बोटं लांब आहे. तू तो कापून छोटा करशील का?"





“बाबा मला आत्ता हे काम नाही करता येणार.” मुलगी म्हणाली “आत्ता मला माझ्या मुलाला दूध पाजायचं आहे. मग मी या चुरगळलेल्या रिबिनींना इस्त्री करेन. पायजमा आखूड करायला तुम्ही आजीला का नाही सांगत.. ती नक्की करेल.”

हसन घरी परत आला आणि विचार करायला लागला. बराच वेळ विचार केल्यावर तो भराभर चालत आपल्या दुकानात गेला. तिथे त्यानं पायजमा बरोब्बर तीन बोटं कापला. मग चपला शिवायची दाभण घेऊन पायजम्याच्या कडा शिवल्या.

मग पायजमा घेऊन तो घरी परत आला. घरी परतल्यावर त्यानं कपाटात तो नवीन पायजमा घडी घालून ठेवला.



पुढच्या दिवशी आपलं दुकान दुपारीच बंद करुन तो घरी आला.

रस्त्यातून चालताना जो कोणी भेटेल त्याला हसन हसून किंवा डोकं किंचित झुकवून सणाच्या शुभेच्छा द्यायचा. सणाच्या सुट्ट्या असल्यामुळे सगळेजण आनंदात होते.







घरी आल्यावर दरवाजातच बायकोनं हसनचं स्वागत केलं आणि म्हणाली, “लवकर या.. सासूबाई आणि आपली मुलगी दोघीही आल्या आहेत.” त्या दोघींना पाहून हसनला आनंदमिश्रित आश्चर्य वाटलं.

हसनच्या आईला नवीन ओढणी छान दिसत होती.

“बेटा, तू कपडे बदल आणि तयार हो.. मग आपण सगळे जत्रेत जाऊ.” हे बोलून आई हसली. त्या हास्यातून ती काहीतरी लपवतेय असा भास होत होता.



“अहो, लवकर तयार व्हा बरं.. आणि तो नवीन पायजमा घाला हं..मी पण नवीन कुरता घातला आहे”. हे बोलताना बायको पण मंदस्मित करत होती. तीही काहीतरी लपवतेय असं हनसला वाटलं.



“आणि बाबा, लवकर आवरा हं.. फार वेळ लावू नका“. मुलीनं सूचना केली. तिनं केसांना नवीन रिबिन लावली होती आणि ती खूपच मस्त दिसत होती. ती पण काहीतरी लपवल्यासारखं हसत होती.

“अरे, या तिघीजणी किती सुंदर दिसतायत.” हसननं मनाशी विचार केला. “माझा पायजमा शिवायला त्यांना वेळ नसला तर काय झालं? आता जत्रेत त्यांना किती आनंद होईल.”

मग हसन नवीन पायजमा घालायला आपल्या खोलीत गेला. पायजमा कमरेला तर आधीपासूनच मापात होता. त्यानं तो हवा तितका आखूडही केला होता...

पण अचानक

“अरे, हे काय ?” हसन ओरडला.

“काय झालं? लागलं का कुठे?” बायकोनं घाबरुन विचारलं.

“ना..ना.. नाही.. पण माझ्या पायजम्याला काही तरी झालंय.”

असं म्हणत तो दरवाजा उघडून बाहेर आला आणि त्यानं सगळ्यांना आपला नवीन पायजमा दाखवला.



त्याचा नवीन सुरेख पायजमा
कसाबसा गुडघ्यांपर्यंतच येत होता.



मग त्याची आई, बायको आणि मुलगी एकाचवेळी म्हणाल्या..

"पण मी तर पायजमा फक्त तीन बोटंच कमी केला होता."

काय झालं ते मग अचानक तिघींच्या लक्षात आलं. तिघी हसनकडे बघायला लागल्या.





बिचारा हसन पण त्या तिघींकडे हताशपणे पहात होता. त्याच्या तोंडातून शब्द फुटत नव्हता.

“अहो..“ बायको म्हणाली. “काल तुम्ही संध्याकाळी तुमच्या मित्राला भेटायला गेलात तेव्हा मला तुमचा पायजमा आखूड करायचं आठवलं. माझा नवरा किती प्रेमळ आहे.. तो घरी यायच्या आत मी हा पायजमा आखूड करुन ठेवते” असा मी स्वत:शी विचार केला.

“मग मी पायजमा कपाटातून काढला. त्याच्या कडा खूप विचित्रपणे शिवल्या होत्या. मग मी मोजून तीन बोटं तो पायजमा कापला. कडांना नीट टीप घातली आणि परत कपाटात ठेवून दिला.”



हसनची आई पश्चात्तापाच्या सुरात म्हणाली "आज सकाळी तुझी बायको सामान आणायला बाजारात गेली होती तेव्हा मी इथे आले होते. माझी पूजा पण करुन झाली होती. मग मी स्वत:शीच विचार केला, "हसन इतका गुणी मुलगा आहे. मी त्याचा पायजमा नीट करुन द्यायला हवा. मग मी कपाटातून पायजमा काढला. खालून मोजून तीन बोटं कापला. कडा शिवल्या आणि परत कपाटात ठेवून दिला. मला तुला आश्चर्याचा धक्का द्यायचा होता."







आता मुलीची पाळी होती. “बाबा, आज सकाळी मी मुलाला पाळण्यात घालून झोके देत होते तेव्हा मला एकदम तुमच्या पायजम्याचं काम आठवलं.” “माझे वडील किती चांगले आहेत” मी स्वत:शी विचार केला. “मला त्यांचा पायजमा आखूड करुन द्यायलाच हवा. मग काय मी मुलाला कडेवर घेतलं आणि पटकन इथे आले. कपाटातून पायजमा काढला, आणि खालून तीन बोटं कापला. ”

“कडा नीट शिवल्या आणि तो पायजमा कपाटात ठेवून दिला. मग मुलाला घेऊन मी परत आले. तुम्हाला सरप्राईज द्यायचं म्हणून मी तुम्हाला सांगितलं नाही.”



हसननं त्या तिघींकडे एकवार कटाक्ष टाकला. मग तो जोरजोरात हसायला लागला. “पण मी तर आधीच पायजमा हवा तितका आखूड करुन ठेवला होता.” तो म्हणाला.

“तुम्ही?” तिघीजणी एका सुरात ओरडल्या.

“हो. कोणीतरी पायजमा छोटा करायलाच हवा होता. मग मी तो तीन बोटं कापून शिवला होता.”





मग ते सगळेजणच जोरजोरात हसायला लागले. हसता हसताच आता काय करता येईल असा विचार करायला लागले. पायजम्याचे कापलेले तुकडे परत त्याला जोडून शिवावेत असा त्यांनी विचार केला.

मग जेव्हा सगळे कापलेले तुकडे पायजम्याला जोडले तेव्हा देवाच्या दयेनं पायजमा हवा तितकाच लांब झाला होता.





"हे बघा.. माझ्या पायजम्यावरची सगळी ठिगळं एकदम नवीन आहेत." हसन हसत हसत म्हणाला.

मग छानसे नवीन कपडे घालून ते सगळे जत्रा बघायला गेले.

